**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-निविदा प्रक्रियेंतर्गत क्वालिफिकेशन क्रायटेरिया बाबत केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सुधारीत सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१९/प्र.क्र.४७/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २५ ऑक्टोंबर, २०१९

<u>वाचा</u> :- (१) सार्वजनिक बांधकाम वि.शासन परिपत्रक क्र. सीएटी २०१७/प्र.क्र.०८/ इमा-२, दि.२७.०९.२०१८
(२) केंद्रिय दक्षता आयोगाच्या क्वालिफिकेशन क्रायटेरिया संदर्भात दि. १७ डिसेंबर २००२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना

<u>प्रस्तावना</u> :-

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार ई-निविदा प्रक्रियेसंदर्भात एकत्रित सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन शासन निर्णयातील सूचना, या महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील तरतुदींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आल्या आहेत. सा.बां.विभागांतर्गत रस्ते, पूल इमारती (तसेच इमारतींचे विद्युतीकरण) यांची बांधकामे नियमित स्वरुपाची असून, ही कामे करणाऱ्या कंत्राटदारांची संख्या सुध्दा लक्षणीय असल्यामुळे, प्रतिसादाचा अभाव / अत्यल्प प्रतिसाद अनाकलनीय आहे. संदर्भाधिन शासन निर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत रु.१५ कोटी पर्यंत किंमतीच्या कामांकरीता, ब-१ ( Percentage rate) नमुन्यात, व रु. १५ कोटी पेक्षा जास्त किमतीच्या कामांकरीता ब-२ नमुन्यात (Item Rate पद्धतीने) Standard Bidding Document (SBD) मध्ये मागविण्यात येत आहेत.

ब-१ / ब-२ / SBD व अन्य निविदा मधील क्वालिफिकेशन क्रायटेरिया हा एखाद्या कंत्राटदारास / कंपनीस निविदा प्रक्रियेमध्ये भाग घेण्यासाठी पूर्णपणे प्रोत्साहनपर व सक्षमता नसल्यास प्रतिबंधपर महत्त्वाचा मापदंड आहे. निविदेमध्ये अस्पष्टरित्या / कमी किंवा बिनमहत्वाच्या बाबीसाठी नमूद केलेल्या क्वालिफिकेशन क्रायटेरियामुळे, निविदा अंतिम करण्याच्या निर्णय प्रक्रियेमध्ये संभ्रम निर्माण होतो व त्याचा परिणाम निविदा निश्चिती करण्यामध्ये होऊ शकतो. **शासन स्तरावर मंजूरीसाठी प्राप्त झालेले निविदा प्रस्ताव तसेच क्षेत्रिय स्तरावर विविध ठिकाणी प्राप्त झालेल्या निविदा प्रस्तावांचा अभ्यास केला असता, निविदा मागविताना अंतर्भूत केलेल्या क्वालिफिकेशन क्रायटेरिया बाबत खूपच विसंगती निदर्शनास येत असून, क्वालिफिकेशन क्रायटेरियाच्या अटींबाबत तक्रारी सुद्धा प्राप्त होत आहेत. बऱ्याचदा एखाद्या कामासाठी विशिष्ट कंत्राटदार विचारात घेऊन त्यास फायदा होईल अशा पद्धतीने क्वालिफिकेशन क्रायटेरिया नमूद करण्यात येत असल्याचे निदर्शनास आले आहे. बहुतांशी ठिकाणी कामाच्या बाबींची निकड / आवश्यकता विचारात न घेता अनावश्यक क्वालिफिकेशन क्रायटेरियाची तरतूद**

**निविदेमध्ये करण्यात येते.** अशा कार्यपद्धतीमुळे गैरव्यवहार/पक्षपातीपणा/भ्रष्टाचारास वाव मिळत असल्याचे सुध्दा निदर्शनास आले आहे. अयोग्य व चुकीच्या क्वालिफिकेशन क्रायटेरिया मुळे बोलावण्यात आलेल्या निविदा सूचनांना प्रतिसाद न मिळणे/एकच निविदा प्राप्त होणे अशाही बाबी निदर्शनास आल्या आहेत. निविदा अटीत महत्वाच्या बाबींची परिमाणे न टाकता, कमी महत्वाच्या बाबींची परिमाणे टाकून, स्पर्धा सिमित केली जाते (उदा.पुलाच्या कामासाठी जोड रस्ता कामाचे डांबरीकरण, मातीकाम,रस्त्याच्या कामासाठी सूचना फलके इ.)

नामांकित व सक्षम कंत्राटदार / कंपनी यांच्याकडून अपेक्षित प्रतिसाद व निकोप तसेच स्पर्धात्मक देकार प्राप्त व्हावा, हे निविदा प्रक्रियेचे उद्दिष्ट असणे आवश्यक असून त्यानुसार क्वालिफिकेशन क्रायटेरिया हा नि:संदिग्धतेसह, सुस्पष्ट व सर्वंकष असणे आवश्यक आहे. क्वालिफिकेशन क्रायटेरिया निश्चित करताना कामाची व्याप्ती व स्वरुप, कंत्राटदार / कंपनी यांचा अशा कामांचा अनुभव व आर्थिक सक्षमता विचारात घेणे आवश्यक आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्ते, पूल व इमारती बांधकामाच्या निविदा प्रक्रियेमध्ये महाराष्ट्र, तसेच अन्य राज्यातूनही निविदाकार भाग घेतात व कामाच्या अनुषंगाने संबंधित कागदपत्रे निविदेसोबत सादर करतात. या अनुषंगाने, या सर्व प्रकरणी एकवाक्यता असण्याच्या दृष्टीने केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना अवलंबणे अत्यावश्यक असल्याने, शासन स्तरावर सखोल अभ्यास करून खालीलप्रमाणे सुधारीत सूचना वजा आदेश निर्गमित करण्यात येत आहेत :-

**सुधारीत सूचना :-**

१. संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मध्ये पोस्ट क्वालिफिकेशन क्रायटेरियाबाबत विविध तरतुदी नमूद केल्या आहेत. परि.२.९ (ब) मध्ये खालीलप्रमाणे नमूद करण्यात आली आहे.

| | |
|---|---|
| मागील ५ वर्षात, कंत्राटदारांने तुल्यबळ किंमतीचे किमान एक त्याच स्वरुपाचे पूर्ण केले असलेल्या कामाची कमीत कमी किंमत | देय कामांच्या किंमतीनुसार (प्रचलित दराने)<br>१. रु. १ कोटी ते रु.१० कोटी पर्यंतच्या कामासाठी : ३०%<br>२. रु. १० कोटी पेक्षा जास्त किमतीच्या कामासाठी : ६०% किंवा रु.६ कोटी यापैकी जास्त असणारी किंमत |

उपरोक्त तरतुदी संदर्भात केंद्रिय दक्षता आयोगाच्या सूचना विचारात घेऊन खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

| | |
|---|---|
| मागील ५ वर्षात, कंत्राटदाराने त्याच स्वरूपाच्या तुल्यबळ किमतीच्या, पूर्ण केलेल्या कामाची किमान किंमत. | देय कामांच्या किंमतीनुसार (प्रचलित दराने)<br>अ. तीन सारख्या पद्धतीची कामे ज्यांची काम निहाय किंमत, बोलावण्यात आलेल्या निविदेच्या अंदाजित रकमेच्या ४०% पेक्षा कमी नसावी<br>किंवा<br>ब. दोन सारख्या पद्धतीची कामे ज्यांची काम निहाय किंमत, बोलावण्यात आलेल्या निविदेच्या अंदाजित रकमेच्या ५०% पेक्षा कमी नसावी<br>किंवा<br>क. एक सारख्या पद्धतीचे काम ज्याची किंमत, बोलावण्यात आलेल्या निविदेच्या अंदाजित रकमेच्या ८०% पेक्षा कमी नसावी. |

१. शासन निर्णय दि.२७/९/२०१८ मधील परि.क्र.२.९(क) नुसार महत्वाच्या परिमाणाच्या बाबी संदर्भात किमान ३०% परिमाणाची अट आहे. या बाबतीत, निविदेतर्गंत महत्वाच्या व आवश्यक (जास्त परिमाण असणाऱ्या कमाल पाच व किमान तीन ) बाबींचे परिमाण नमूद करण्यात यावे व या बाबींची एकूण किंमत निविदा किंमतीच्या ३०% पेक्षा जास्त रकमेची नसावी.

२. निविदा मागवितांना क्वालिफिकेशन क्रायटेरिया बाबत वरील तरतूदी समाविष्ठ करुन निविदा मागविण्याबाबत कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२५१४३६०३८११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.10.25 14:37:57 +05'30'

( चंद्रशेखर जोशी )
सचिव ( रस्ते ), महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२) मा. मंत्री (सा. बां. ) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव.
४) सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग (विद्युतसह)

५) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
६) संचालक, उद्याने व उपवने, मुंबई
७) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य / विद्युत/यांत्रिकी)
८) सर्व कार्यकारी अभियंते / सर्व उपअभियंते
९) कार्यासन इमारती-२ (निवडनस्ती).